

फार फार वर्षांपूर्वी भारतात एक युवा राजा होता. त्याच्याकडे हत्ती आणि मोर होते, पांढरे वाघ आणि काळे सिंह होते, माणिक आणि हिरे होते. पण त्याच्याकडे दिव्य घोडा नव्हता.





आता तुम्हाला प्रश्न पडला असेल, हा दिव्य घोडा आहे तरी काय? खरंच, दुर्मिळ खजिना आहे तो! आकाशातील देवदूतांनी त्याला शहाणपण आणि धैर्य, ऐश्वर्य आणि यश यांचे वरदान दिलेले आहे. त्याच्यावर जो स्वार होईल, त्याला हे सर्व गुण तो बहाल करणार आहे. त्याची सुंदर पांढरीशुभ्र कांती चंद्रकांत मण्यासारखी मऊसुत आहे. त्याची आयाळ सागरातील लाटांसारखी चमकते. त्याच्या पायाखालून आगीच्या ज्वाळा निघतात आणि त्याचा आवाज सोन्याच्या तुतारीतून निघणाऱ्या आवाजासारखा घुमतो.

राजाने घोषणा केली की हा घोडा शोधून आणणाऱ्यास डोंगराएवढी माणके बक्षीस मिळतील. कारण कालिया या बहुमुखी आणि अतिशय भयानक सापापासून आपल्या राज्याचे संरक्षण फक्त दिव्य घोडाच करू शकतो, हे राजा जाणत होता.



राजाच्या देशात एक माणूस उदरनिर्वाहासाठी घोडे पाळत असे. वसंत ऋतूतील एका आल्हाददायक दिवशी त्याने बाजारात जाऊन आपल्या घोड्यांची विक्री करायचे ठरवले. पण वाटेत, त्याच्या एका घोडीने पांढऱ्याशुभ्र पिल्लाला जन्म दिला. हे पाहून इतर घोड्यांनी आपल्या चालण्याचा वेग मंद केला आणि शेवटी ते सर्व एके ठिकाणी थांबले.





“मोठी अडचणच झाली!” घोडेवाल्याच्या मनात आले. “हे पिल्लू जन्मल्यामुळे आधी प्रवास थांबला आणि आता तर ते सगळ्यांवर लाथा झाडतंय! खूप चंचल दिसतंय. नुसतंच इकडे-तिकडे उड्या मारतंय. हे लोकांना चावायलाही मागे-पुढे पाहाणार नाही वाटतं. वाटेत भेटणाऱ्या पहिल्याच माणसाला हे विकून टाकलेलं बरं.”



पण कुणीच ते पिल्लू खरेदी केले नाही. “नकोय मला,” भेटणारा प्रत्येक जण म्हणाला. “तुझं हे पिल्लू लाथा झाडतंय, चावरंसुद्धा दिसतंय. तापच होईल डोक्याला!” लवकरच या भयंकर पिल्लाची वार्ता सर्वत्र पसरली.







एका माणसाला मात्र ही वार्ता कळली नव्हती, सतत आपल्याच धुंदीत असणाऱ्या कुंभाराला. कुंभाराने त्या पिल्लाकडे बघितले, तेव्हा अजबच घडले. ते शिंगरू (घोड्याचे पिल्लू) इतर घोड्यांसमोर नाचू-बागडू लागले, कुंभारासमोर उड्या मारू लागले आणि कुंभाराच्या गालावर आपले नाक घासू लागले.

हे पिल्लू आता कुंभाराच्या कानाचा चावा घेईल नाहीतर त्याला लाथ मारून त्याची मडकी फोडून टाकेल, अशी भीती घोडेवाल्याला वाटू लागली. पण याउलट पिल्लू पाळीव कुत्र्यासारखे कुंभाराचा हात चाटू लागले.





पिल्लाचा कुंभाराप्रती लळा पाहून घोडेवाला कुंभाराला म्हणाला, "छान! माझ्याकडे एकही मडकं नाही. तुझ्याकडची सगळी मडकी मला दे. त्याबदल्यात तू हे पिल्लू घेऊन जा. खरंतर, त्याला अलग करण्याची कल्पनाही मला सहन होत नाहीये."
कुंभारालाही त्या अवखळ पिल्लाचा लळा वाटू लागला. घोडेवाल्याने सुचवलेला सौदा त्याला पटला.





पिल्लू खूपच चंचल होते. पण आश्चर्य म्हणजे, कुंभाराच्या झोपडीबाहेर ते काळजीपूर्वक बागडू लागले. पिल्लाने मडक्यांच्या आसपास सावधपणे पावले टाकली आणि एकही मडके फोडले नाही.

एकदा कुंभार माती आणण्यासाठी बाहेर गेला. पिल्लूसुद्धा त्याच्या मागे दुडूदुडू धावत गेले. आपल्या मालकाची पिशवी मातीने जड झाली आहे, हे पाहिल्यावर त्याने पिशवी वाहून नेण्यासाठी आपली पाठ पुढे केली.

कुंभाराच्या मनात आले, “किती हुशार आणि समजूतदार आहे हे जनावर! त्याच्यासाठी तबेला बांधायला हवा.” कुंभाराने तबेला उभारला. त्याने पिल्लाला चांगले खाऊ-पिऊ घातले. कालांतराने, या लहान पिल्लाचे रुपांतर एका अद्भुत उमद्या घोड्यामध्ये झाले.



दरम्यान, राजाच्या दरबारातील कुणीही दिव्य घोड्याचा शोध घेऊ शकले नाही. डझनभर ज्योतिष्यांनाही मदतीसाठी बोलावण्यात आले. कारण बहुमुखी साप कालिया राज्यानजिक पोहोचल्याचा अंदाज होता. ज्योतिषांनी चंद्र-ताऱ्यांची प्रार्थना केली, मंत्र उच्चारले, होमहवन केले, पण दिव्य घोड्याचा ठावठिकाणा काही कळला नाही. शेवटचा उपाय म्हणून त्यांनी बिलोरी काचेच्या गोळ्यात पाहायचे ठरवले. गोळ्यामध्ये त्यांना चंद्रकांत मण्यासारख्या पांढऱ्याशुभ्र घोड्याची आकृती दिसली. घोड्याच्या पायातून आगीच्या ज्वाळा निघत होत्या.

“सापडला,” ज्योतिषी ओरडले. “याच्या नशिबात शेकडोंचा सरदार व्हायचं लिहिलंय, हे निश्चित. पण याला शोधून कसं काढायचं?” त्यांनी काचेच्या गोळ्यात पुन्हा पाहिले. एक कुंभार या अद्भुत घोड्यावर मातीने भरलेले पोते लादत असल्याचे त्यांना दिसले. “हाच तो घोडा!” सगळे एकसुरात बोलले. “आपण राज्यातल्या प्रत्येक कुंभाराकडे जाऊ. कुणाकडेतरी घोडा सापडणारच.”









त्या कुंभाराचा ठावठिकाणा शोधण्यास फार वेळ लागला नाही. बारा-बारा राजज्योतिषी आपल्या झोपडीच्या दारात आलेले पाहून कुंभार आश्चर्यचकीत झाला. हे सगळे त्याचा घोडा कोणत्याही किंमतीत खरेदी करण्यासाठी आलेले आहेत, हे ऐकून तर तो आश्चर्याने थक्कच झाला.



पण कुंभाराला आपला घोडा विकायचा नव्हता. आणि विकायचे ठरवले तरी तो त्याची किंमत ठरवू शकत नव्हता. अस्वस्थ मन:स्थितीत तो तबेल्यात गेला आणि शांतपणे विचार करू लागला. अचानक त्याची शांतता भंग पावली.

“तुला काय पाहिजे ते माग!” त्याचा घोडा गंभीर आवाजात चक्क बोलत होता. कुंभाराला मोठा धक्काच बसला. घोडा बोलतोय! भीतीने आ वासून तो घोड्याकडे टक लावून पाहात राहिला.

घोडा हळुवारपणे बोलू लागला, “घाबरू नकोस. मी दिव्य घोडा आहे. माझ्या नशीबात राजाची सेवा लिहिली आहे. दु:खी होऊ नकोस, दर वर्षी मी इथे राहायला येत जाईन.”

आपल्या हातात काही नाही, हे गरीब कुंभाराला कळून चुकले. त्याने आपले हात मायेने त्याच्या मित्राच्या गळ्यात टाकले आणि त्याला निरोप दिला. ।





कुंभार आणि त्याचा घोडा राजज्योतिषांकडे परतले. ते त्याच्या उत्तराची वाट बघत होते. पण कुंभार काही बोलण्याच्या मनस्थितीत नव्हता. मग दिव्य घोडा पुढे झाला आणि म्हणाला, “या कुंभाराने माझी फार प्रेमाने काळजी घेतली. त्याच्याकडे मातीचा डोंगर आणि राज्यातील सर्वोत्तम चाक असायला हवं. आपली मडकी बाजारात घेऊन जाण्यासाठी त्याच्याकडे ताकदवान बैल आणि शानदार गाडी हवी. यासोबतच त्याच्याकडे घोडे आणि म्हशी, मेंढ्या आणि बकऱ्या, कोंबड्या आणि कोंबडे यांनी भरलेला तबेला हवा.”

क्षणातच तिथे हे सारे प्राणी अवतरले. कुंभार त्यांना पाहाण्यात एवढा दंग झाला की त्याचा लाडका घोडा तिथून कधी निघून गेला, हेदेखील त्याला कळले नाही.









राजदरबारात लोकांनी दिव्य घोड्याचे भव्य स्वागत केले. त्यांनी घोड्याला लाल रंगाचे सोन्याचे खोगीर आणि चांदीचे बूट दिले, त्याच्या गळ्यात फुलांचे हार घातले, बिगूल वाजवले, रेशमी झेंडे फडकवले, घोडे-हत्ती यांच्यावर बसलेल्या सैनिकांनी उभे राहून त्याला सलामी दिली. युवा राजा पुढे आला आणि दिव्य घोड्यावर येऊन बसला तेव्हा लोकांनी आनंदाने जयघोष केला.



पण त्याच क्षणी बहुमुखी साप कालिया शहराच्या सीमेवर आला. त्याच्या सोबत फुत्कार टाकणाऱ्या पाचशे सापांचे सैन्य होते. ते पाचशे घोड्यांवर स्वार झाले होते.
इतक्यात दिव्य घोड्यावर स्वार झालेला युवा राजा तीरासारखा वेगाने दौडत आपल्या शत्रुसमोर येऊन ठाकला. दिव्य घोडा आपल्या मागल्या पायांवर उभा राहून मोठ्याने खिंकाळू लागला. ते पाहून कालियाचे पाचशे घोडेदेखील खिंकाळू लागले आणि उड्या मारू लागले. त्यांनी आपल्या पाठीवर स्वार झालेल्या सापांना भिरकावून दिले आणि आपल्या पायाखाली तुडवून ठार केले. कालियाने आपले संपूर्ण सैन्य गमावले. माघार घेऊन त्याला राज्याबाहेर दूर डोंगरदऱ्यांमध्ये निघून जावे लागले.







सरतेशेवटी हा महान विजय आणि शांती साजरे करण्यासाठी राजाने तो दिवस पवित्र सुट्टी म्हणून घोषीत केला. संपूर्ण राज्यात आवाज घुमू लागला “राजाचा विजय असो! दिव्य घोड्याचा विजय असो!” मोर आपल्या चोचीत धरलेली फुले नाचवू लागले, काळे सिंह आणि पांढरे वाघ आनंदाने उड्या मारू लागले तर घोडे आणि हत्ती नाचू लागले.








प्राचीन भारतीय लोककथांमधील राजांच्या अंगी दैवी गुण होते. त्यांनी या दैवी गुणांचा वारसा आपल्यानंतर इतर राजांकडे सोपवला. त्यांमुळे भारतीय राजांना फक्त लष्करी प्रमुखच नव्हे तर दिव्य पुरूष असाही दर्जा होता.
*दिव्य घोडा* हे पुस्तक आपल्याला एका भारतीय राजाची गोष्ट सांगते. या राजाला एक दिव्य घोडा मिळतो. तो वाईट गोष्टींना समूळ नष्ट करतो आणि चांगल्या गोष्टींची पुन:स्थापना करतो.

लेखिकेबद्दल....

*डेमी* या लेखिकेने मुलांसाठी पन्नासपेक्षा जास्त पुस्तके लिहिली आहेत. त्यांनी या पुस्तकांतील गोष्टींसाठी चित्रेसुद्धा काढली आहेत. पौर्वात्य देश, तेथील संस्कृती यांबद्दल त्यांना नेहमीच आकर्षण वाटत आले. याचा त्यांच्या कामाच्या शैलीवर आणि हेतूवर चांगलाच प्रभाव पडला. त्यांनी भारतातील बडोदा विद्यापीठात (फुलब्राईट शिष्यवृत्तीचा भाग म्हणून) शिक्षण घेतले. तिथेच त्यांना *दिव्य घोडा* ही गोष्ट लिहिण्याची स्फूर्ती मिळाली.
डेमी न्यूयॉर्क शहरात राहातात.

